**प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**
**अर्थसंकल्पीय अधिवेशनातील अर्थसंकल्पीय प्रकाशने विधानमंडळ सदस्य व इतरांना वाटप करण्यासाठी बॅग्ज खरेदी करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२०/प्र.क्र.०५/अर्थ-३,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- २२ जानेवारी, २०२०.**

<u>संदर्भ</u> :- १) शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग, क्रमांक : भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१६.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०१६/प्र.क्र.२५/अर्थ-३, दि.१४.२.२०१७.
३) शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग, क्रमांक : संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दि.२४.०८.२०१७.

**<u>प्रस्तावना</u> :-**

राज्याचा अर्थसंकल्प विधानमंडळास सादर केल्यानंतर त्याबाबतची अर्थसंकल्पीय प्रकाशने विधानमंडळ सदस्यांना देण्यात येतात. सदर प्रकाशनांची संख्या लक्षात घेऊन सन १९७६ पासून प्रथमत: ती रेक्झिन बॅग्ज मध्ये व तद्नंतर सन १९८१ पासून ती चांगल्या प्रतीच्या लगेज / ट्रॉली बॅग्जमध्ये देण्याची प्रथा शासनाने सुरु केलेली आहे. विधानमंडळ सदस्यांबरोबरच महत्वाची अर्थसंकल्पीय प्रकाशने व बॅग्ज वृत्तपत्र प्रतिनिधी तसेच शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना देण्यात येत आहेत. राज्याच्या अर्थसंकल्पाबाबतची सविस्तर माहिती लोकप्रतिनिधी व वृत्तपत्र प्रतिनिधी मार्फत जनतेपर्यंत मिळावी तसेच अर्थसंकल्प तयार करण्याच्या कामकाजात सहाय्य करणाऱ्यांना प्रोत्साहन मिळावे हा यामागचा उद्देश आहे. यासाठी बॅग्ज खरेदी व ती पुरविण्याची कार्यवाही शासनाच्या वित्त विभागामार्फत करण्यात येते. सन २०२०-२०२१ चा अर्थसंकल्प सादर करतेवेळी अर्थसंकल्पीय प्रकाशने वितरणाबाबत सदर बॅग्ज खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सन २०२०-२०२१ चा अर्थसंकल्प सादर करतेवेळी अर्थसंकल्पीय प्रकाशने विधानमंडळ सदस्य व इतरांना वाटप करण्यासाठी <u>८८९ हार्ड टॉप, ४ चाकी, लगेज ट्रॉली बॅग्ज</u> व विधानमंडळात मा.वित्त मंत्री यांचे अर्थसंकल्पीय भाषण सादर करण्यासाठी <u>०२ लहान लेदर बॅग्ज</u> खरेदी करण्यासाठी तसेच खरेदी निविदेची जाहिरात व इतर संकीर्ण खर्च धरुन होणाऱ्या एकूण अंदाजित रु.६५.११ लक्ष इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर खरेदी संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक ०१.१२.२०१६ च्या शासन निर्णयासोबतच्या “शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीच्या सुधारीत नियमपुस्तिकेतील”

तरतूदींना अनुसरुन ई-निविदा प्रक्रियेद्वारे व संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (खुद्द) खरेदी समिती मार्फत करण्यात येईल.

२. यावर होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष, २०५२- सेक्रेटरिएट-सर्वसाधारण सेवा, (००) ०९०, सेक्रेटरिएट, (००)(०१) वित्त विभाग (२०५२ ०२३२), १३ - कार्यालयीन खर्च, या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५ व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उप विभाग-चार, अनुक्रमांक-८ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटीस अधीन राहून तसेच प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२२१२५८०५०५०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant K. Patil

Digitally signed by Vasant K. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=56462e610dbf070fe5eefa98886b167556f80b373181ed680e4c9c879d7e3617, serialNumber=14caf70544d4d2fb25d1da6ed673b0488e940d807179c09470fcdd9192ba4ce7, cn=Vasant K. Patil
Date: 2020.01.22 13:02:29 +05'30'

**( व. कृ. पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.राज्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (उद्योग) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई,
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (व्हीएलसी शाखा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
६. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
७. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. वरीष्ठ कोषागार अधिकारी, मुंबई,
१०.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
११.उप सचिव / अवर सचिव (रोख शाखा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२.उप सचिव / कार्यासन अधिकारी (प्रशासन-५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३.निवड नस्ती, अर्थ-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.